ओम नमो जी आद्या! (श्री ज्ञानदेव कृत गणेशवंदना- भाग ३)

ओम नमो जी आद्या!
वेदप्रतिपाद्या
जय जय स्वसंवेद्या
आत्मरुपा!
महाविष्णूचा अवतार भगवान श्रीज्ञानेश्वर महाराज आपल्या भावार्थ दीपिकेच्या आरंभी मंगलाचरण साधत आहेत. भारतीय संस्कृतीचे अंतिम गंतव्यरूप ओंकाराचेच आद्यवंदन. तोच आदी तोच अंत. वर्तुळाचे हेच वैभव आहे. आरंभ बिंदूच जसा त्याचा अंतिम बिंदू असतो तशीच रचना या संसारचक्राची आहे. या संसाराचा आरंभबिंदू आहे. संसारांश असलेल्या आपल्या सगळ्यांचे अंतिम साध्य आहे ओंकार. माऊली त्या परमआद्यतत्वरूप ओंकाराचा जयघोष करत आहेत.

तो ओंकार आद्य तत्व आहे. आद्य आहे या शब्दातच अनादी आहे हे गृहीत आहे सगळ्यांचे परमकारण असणा-या तत्त्वालाच 'आद्या' शब्द शोभतो. त्याच्या आधी कोणीच नाही. त्याचा निर्माता कोणीही नाही. तोच सर्वांचा आरंभ आहे.

वेद, वेदांत, पुराणे, शास्त्रे सगळे काही केवळ आणि केवळ त्या एकटया ओंकाराचेच वर्णन करतात. याच कारणाने भगवान श्रीवेदव्यासांची वरपांगी विचित्र वाटणारी उक्ती आहे.

अष्टादश पुराणेषु एकस्यही वै वर्णनम! अर्थात अठराही पुराणांमध्ये केवळ एकटयाचेच वर्णन आहे. वरपांगी तर तसे दिसत नाही भागवतात श्रीहरी, शिवपुराणात श्रीशंकर तर अन्यान्य पुराणात अन्यान्य देवता प्रधान वाटतात. मग श्रीव्यास असे कसे म्हणतात? तर त्याचे सरळ, साधेसोपे समाधान एकच आहे की तो म्हणजे 'ओंकार' सर्वत्र केवळ आणि केवळ एकटया ओंकाराचेच वर्णन आहे. अन्य कोण्या देवतेचे वाटत असले तरी ते अंशरूप आहेत.

शास्त्रकार वर्णन करतात-
अकारो वासुदेवस्यात! उकारस्तु महेश्वर:!
मकार: सुर्यइत्युक्त:! शक्तीनादात्मिका मता!
ओंकारात साडेतीन मात्रा आहेत. 'अ', 'उ' आणि 'म' या तीन मात्रा आणि अर्धमात्रारूप नाद.
या पैकी 'अ' म्हणजे श्रीहरी, 'उ' म्हणजे श्रीमहेश्वर-शिव, 'म' म्हणजे सूर्य आणि नाद म्हणजे आदिशक्ती भगवती जगदंबा. ही मांडणी विविध शास्त्रात विविध रुपात स्वीकारली आहे, स्पष्ट केली आहे. उदा. जगदंबेच्या महानतम ग्रंथरूप श्रीदुर्गासप्तशतीतील तिचे वर्णन पहा-
'अर्धमात्रा स्थितानित्या
यानुचार्या विशेषत:!
जगदंबा अर्धमात्रास्थित आहे हे शाक्तग्रंथही अधोरेखित करतात! थोडाफार संदर्भ बदलत जगदगुरु तुकोबारायही हीच भूमिका मांडतात.
अकार तो ब्रह्मा! उकार तो विष्णू!
मकार महेश! मानियेला!
अर्थात सगळ्याच देवतांचे एकत्रीकरण म्हणजे ओंकार. मात्र या कथनात एक सूक्ष्म मेख आहे. सगळ्या देवता ओंकाराचे अंशरुप आहेत हे म्हटल्यामुळे एक वेगळा अर्थ ध्वनित होतो की त्या अंशरूपच आहेत. परिपूर्ण नाहीत.

आपल्यापेक्षा अगदी ग्रहणक्षत्रादिक देवताही श्रेष्ठ आहेत. त्या आपणास वंदनीय आहेत. इंद्रादिक त्यांच्याही पेक्षा श्रेष्ठ 'ईश्वर' आहेत तर विष्णू शंकरादिक 'महेश्वर' आहेत. त्यामुळे त्यांच्या परमश्रेष्ठत्वाचा परिपूर्ण आदर करूनही हे सत्य बदलत नाही की ते परात्पर ब्रह्म नाहीत. ते पूर्ण ओंकार रूप नाहीत. ते ओंकाराचे अंश रूपच आहेत. एकेका मात्रेचेच अधिकारी आहेत.
मग संपूर्ण ओंकाराचे एकत्रित वर्णन काही असूच शकत नाही का? पूर्ण ओंकार रूप दैवत कोणतेच नाही का? तर आहे. कोणते? तर माझा मोरया. म्हणूनच माऊली म्हणते-
देवा तूची गणेशु!
सकलार्थप्रती प्रकाशु!

म्हणे निवृत्तिदासु!
अवधारिजो जी!
यातील 'अवधारिजो जी!' ही शब्दकला मोठी सुंदर आहे. संस्कृतच्या उपसर्ग लावून धातूच्या अर्थाला अधिक सबल, दृढ करण्याच्या रीतीला माऊली उपयोजित आहे. त्यातही दृढ करण्याची रीती कशासाठी तर निश्चय करण्यासाठी. अर्थात दृढनिश्चय करा. पक्की खुबागाठ बांधा. निश्चितरीत्या समजून घ्या. नि:संशयरीत्या ध्यानी धरा. नि:शंकतेने जाणून घ्या म्हणजे 'अवधारिजो जी!' काय अवधारिजे? तर 'देवा तूची गणेशु!'
आद्य, वेदप्रतीपाद्य, स्वसंवेद्य ओंकार म्हणजेच श्रीगणेश. अष्टादश पुराणाचे एकमेव वर्ण्य तत्व श्रीगणेश. सकलशास्त्रांचे एकमेवाद्वितीय कथानीय श्रीगणेश.
श्रीगणेशांच्या या ओंकार रुपाला माऊली एका अलौकिक रीतीने आपल्या हृदयी सुस्थापित करते.
अकार चरणयुगुल! उकार उदार विशाल!
मकारू महामंडल! मस्तकाकारे!
अन्य महेश्वरांना ओंकाराच्या मात्रा रुपात वर्णिले. ते अंश, ओंकार अंशी अशी रचना पाहिली मात्र येथे ओंकाराच्या मात्रारूप अंशांना मोरयाचे अंगरूप वर्णिले. मात्रा या अंग आहेत तर अंगी रूप मोरया पूर्ण ओंकार ब्रह्म आहेत- देवा तूंचि गणेशु!

एखाद्या गाणपत्य उपासकाने हे वर्णन केले असते तर त्याला 'सांप्रदायिक अर्थवाद' रुपात आपण बोलवू शकलो असतो. पण महावैष्णव आणि आदिनाथ परंपरेचे पाईक माऊली जेव्हा हे वर्णन करते तेव्हा तो परमसत्यतेचा सिंहनाद आहे हे विशेषत्वाने लक्षात घ्यायला हवे.

या ओंकारालाच शास्त्र एकाक्षरब्रह्म म्हणते. शब्दब्रह्म म्हणते. एकदा मोरयाचे हे ओंकार रुपत्व नि:संशयरीत्या मनी ठसले की मग त्यांचे बाह्यरुपही असेच परमदिव्य वाटते.
याचसाठी माऊली म्हणते-
हे शब्दब्रह्म अशेष!
तेचि मूर्ती सुवेष!
मोरयाची मूर्ती शब्दब्रह्म आहे. अमुर्ततेत ओंकाररुपत्व विशद केल्यावर माऊली म्हणत आहे केवळ तात्विक पातळीवरच नाही तर मुर्तरुपातही मोरया असाच आहे.

मोरयाची 'मूर्ती' ही माऊलींच्या लेखी अशीच 'ज्ञानमय' आहे. कशी? पुढील लेखात पुढील चतुर्थीस. तोवर जय गणेश!